# महाराष्ट्र शासन
## वित्त विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रवास-१०१७ / प्र. क्र. १५/सेवा-५

मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई ४०० ०३२
तारीख: ०१ ऑगस्ट, २०१८

**वाचा -**

**१) शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग क्र.प्रवास-१०१०/प्र.क्र.२/सेवा-५, दि.०३ मार्च, २०१०,**

**प्रस्तावना -**

संसदीय कार्य विभागाने सन १९७७ मध्ये अधिसूचित केलेल्या महाराष्ट्र मंत्र्यांचे भत्ते नियमातील, नियम क्रमांक १५(४)(दोन) मधील तरतुदीनुसार मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांना त्यांच्या पत्नीसमवेत विमानाने, शासकीय दौरा करण्याची अनुमती देण्यात आली आहे. विधानमंडळाचे पिठासीन अधिकारी, विरोधी पक्ष नेते, मंत्री व राज्यमंत्री यांच्या समवेत, त्यांच्या पत्नीच्या गैरहजेरीत विधानमंडळाचे पिठासीन अधिकारी, विरोधी पक्ष नेते, मंत्री व राज्यमंत्री यांच्या आस्थापनेवरील खाजगी सचिव / विशेष कार्य अधिकारी / स्वीय सहायक या पदावरील शासकीय अधिकाऱ्यांना / कर्मचाऱ्यांच्या विमान प्रवासाबाबतच्या वित्त विभागाच्या दिनांक ०३.०३.२०१० मधील तरतुदी सुधारीत करण्याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. त्या अनुषंगाने खालील प्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

## शासन निर्णय-

शासकीय कर्मचाऱ्यांना अनुज्ञेय असलेल्या प्रवास भत्ता व दैनिक भत्त्याच्या दरात सुधारणा करण्याबाबत वित्त विभागामार्फत दि.०३.०३.२०१० रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. दिनांक ०३.०३.२०१० चा परिच्छेद क्रमांक ४.१ (ड) खालील प्रमाणे आहे:-

> "तसेच मुख्यमंत्री व उपमुख्यमंत्री यांच्या खाजगी सचिवांना ते मुख्यमंत्री व उपमुख्यमंत्री यांचेसोबत प्रवास करीत असतील तरच आणि मुख्यमंत्री व उपमुख्यमंत्री यांच्या पूर्वपरवानगीनेच इकॉनॉमी क्लासने विमानप्रवास अनुज्ञेय राहील. मंत्री व राज्यमंत्री यांचे आस्थापनेवरील खाजगी सचिव / स्वीय सहायक यांना तसेच मुख्यमंत्री व उपमुख्यमंत्री यांच्या आस्थापनेवरील स्वीय सहाय्यकांना विमान प्रवास अनुज्ञेय असणार नाही.

उपरोक्त परिच्छेद आता अधिक्रमित करण्यात येत असून, वित्त विभागाच्या दि.०३.०३.२०१० च्या शासन निर्णयातील सदर परिच्छेद क्रमांक ४.१ (ड) खालील प्रमाणे सुधारीत करण्यात येत आहे.

“तसेच मुख्यमंत्री व उपमुख्यमंत्री यांच्या खाजगी सचिवांना ते मुख्यमंत्री व उपमुख्यमंत्री यांचेसोबत प्रवास करीत असतील तरच आणि मुख्यमंत्री व उपमुख्यमंत्री यांच्या पूर्वपरवानगीनेच इकॉनॉमी क्लासने विमानप्रवास अनुज्ञेय राहील. तसेच विधानमंडळाचे मा.पिठासीन अधिकारी, विरोधी पक्ष नेते, मंत्री व राज्यमंत्री यांच्या पत्नीच्या गैरहजेरीत शासकीय दौऱ्यावर असतांना मान्यवरांच्या पूर्वपरवानगीने शासकीय अधिकारी / कर्मचारी असलेल्या कार्यरत खाजगी सचिव / विशेष कार्य अधिकारी / स्वीय सहायक यांचेपैकी एकास सोबती म्हणून विमान प्रवास सवलत अनुज्ञेय करण्यास खालील अटींवर मान्यता देण्यात यावी.

१) सदर व्यक्ती सामान्य प्रशासन विभागाच्या मान्यतेने मंत्री / राज्यमंत्री यांच्या कार्यालयीन आस्थापनेवर कार्यरत असली पाहीजे.

२) सदर व्यक्तीने मान्यवरांसोबतच मात्र सामान्य वर्गातून (Economy Class) प्रवास केला पाहीजे.

३) प्रवासाच्या देयकासोबत बोर्डींग पास जोडणे आवश्यक राहील. ”

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८०११६१६२१७६०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhalchandra Jagannath Gadekar

Digitally signed by Bhalchandra Jagannath Gadekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=93c75178c3c4e1daaeb069f4e437a48fd302aabd765450129e4447d5a1da1f2a, serialNumber=d2671e08dbf49e6a42b865d026c3f07bc1eb8254056eab8fa6b4b0fb72dd47ba, cn=Bhalchandra Jagannath Gadekar
Date: 2018.08.01 16:23:06 +05'30'

**(भा.ज.गाडेकर)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

| | | | |
|---|---|---|---|
| | मा.विरोधी पक्ष नेता, विधान परिषद /विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई | | *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई. |
| | सर्व सन्माननीय विधानसभा, विधान परिषद व संसद सदस्य | | *प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई |
| | महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई | | आयुक्त, राज्य माहिती आयोग (सर्व) |
| | महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर | | सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई |

| | | | |
|---|---|---|---|
| | अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई | | सिनीअर रिसर्च ऑफीसर, पे युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय(व्यय विभाग),खोली क्रमांक २६१, नॉर्थ ब्लॉक, नवी मुंबई |
| | निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई | | संचालक लेखा व कोषागारे, मुंबई |
| | राज्यपाल यांचे सचिव | | मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई |
| | मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई | | बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई-१ (५प्रती) |
| | सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक | | भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बरॅक नं, योगक्षेम समोर, वसंतराव गवस चौक, नरीमन पॉईंट, मुंबई २० (५ प्रती) |
| | मंत्रालयीन सर्व विभाग | | भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस.व्ही.पटैल रोड, मुंबई४ (५प्रती) |
| | सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव मंत्रालय, | | भारतीय कम्युनिस्ट पार्टी(मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल्, ग्लोब मिल पॅसेल, वरळी, मुंबई१३ (५प्रती) |
| | सचिव, मा. सभापती, विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई | | इंडीयन नॅशनल कॉँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई२५ (५प्रती) |
| | सचिव, मा. अध्यक्ष, विधान सभा, विधानमंडळ, मुंबई | | नॅशनॅलिस्ट कॉँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई -२१ (५प्रती) |
| | *प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई. | | शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २५ (५ प्रती) |
| | *प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई. | | जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई |
| | *प्रधान सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई. | | वित्त विभागातील सर्व कार्यासने |
| | | | निवडनस्ती, वित्त विभाग/सेवा-५ |